प्रतिनियुक्तीवरील सेवा प्रत्यावर्तित करणेबाबत
**श्रीमती गीता कुळवंत, कक्ष अधिकारी**

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग**
**शासन आदेश क्र. कअनि-१११९/प्र.क्र.३०/प्रशा-२ (१४ब)**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा रोड,
मंत्रालय, मुंबई. ४०० ०३२
दिनांक:- २६ ऑगस्ट, २०२४

**संदर्भ:-** १) सा.प्र.वि. शा.नि. क्र.एसआरव्ही-२०११/प्र.क्र.१३७/का.१२,दि.१७.१२.२०१६
२) सा.प्र.वि. शा.नि. क्र.एसआरव्ही-२०१६/प्र.क्र.५१०/का. १२, दि.१६.०२.२०१८
३) समक्रमांक शासन आदेश दिनांक १४.०८.२०१९, दिनांक १५.०१.२०२१, दिनांक ०२.०९.२०२१ व दिनांक ११.१२.२०२३

## शासन आदेश

श्रीमती गीता गो.कुळवंत, कक्ष अधिकारी, नियोजन विभाग यांची संदर्भाधीन क्र.३ येथील दिनांक १४.०८.२०१९ च्या आदेशान्वये सामान्य प्रशासन विभागाच्या अधिपत्याखालील राज्य माहिती आयोग, पुणे खंडपीठ, पुणे या कार्यालयातील “कक्ष अधिकारी” या पदावर प्रथमत: एक वर्षाच्या कालावधीसाठी प्रतिनियुक्तीने नियुक्ती करण्यात आली होती. त्यानुसार श्रीमती कुळवंत या सदर कार्यालयात दिनांक ३०.०८.२०१९ पासून प्रतिनियुक्तीने कार्यरत आहेत. त्यांनतर श्रीमती कुळवंत यांच्या प्रतिनियुक्तीच्या कालावधीस दिनांक १५.०१.२०२१, दिनांक ०२.०९.२०२१ व दिनांक ११.१२.२०२३ च्या आदेशान्वये आणखी ०४ वर्षे मुदतवाढ देण्यात आली असून त्यांचा प्रतिनियुक्तीचा कालावधी दिनांक २९.०८.२०२४ रोजी संपुष्टात येत आहे. श्रीमती कुळवंत यांचा राज्य माहिती आयोग, पुणे खंडपीठ, पुणे या कार्यालयातील प्रतिनियुक्तीचा एकूण कालावधी ०५ वर्ष इतका पूर्ण होत आहे.

२. शासन निर्णय, दिनांक १६.०२.२०१८ मधील अ.क्र.१ (क) मध्ये नमूद तरतूदीनुसार श्रीमती गीता कुळवंत, कक्ष अधिकारी, नियोजन विभाग यांच्या राज्य माहिती आयोग, पुणे खंडपीठ, पुणे या कार्यालयातील “कक्ष अधिकारी” या पदावर करण्यात आलेली प्रतिनियुक्तीने नियुक्ती संपुष्टात आणून, त्यांच्या सेवा त्यांच्या मूळ विभागाकडे म्हणजेच नियोजन **विभागाकडे दिनांक २९.०८.२०२४ (म.नं.)** पासून प्रत्यावर्तित करण्यात येत आहेत.

३. श्रीमती गीता गो.कुळवंत, कक्ष अधिकारी यांनी नियोजन विभागात **दिनांक ३०.०८.२०२४ (म.पू.)** रोजी रुजू व्हावे.

४. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक २०२४०८२६१७३६१५२४०७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकीत करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Digitally signed by GAJANAN SAHADEO PARAB
Date: 2024.08.26 17:51:35 +05'30'

**( ग. स. परब )**
**अवर सचिव,महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

श्रीमती गीता गो.कुळवंत, कक्ष अधिकारी, राज्य माहिती आयोग, पुणे खंडपीठ, पुणे

**प्रत,**

१) अपर मुख्य सचिव (सेवा), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई
२) अपर मुख्य सचिव, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई
३) सह सचिव/उप सचिव (आस्थापना), नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
४) उपसचिव (कार्या-०६), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई
५) उपसचिव, राज्य माहिती आयोग, पुणे खंडपीठ, पुणे
६) निवड नस्ती/संग्रहार्थ (का.१४ब)